**डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या विद्यापीठास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात निधी वितरीत करण्याबाबत (कार्यक्रम खर्च)...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: कोकृवि-११२४/प्र.क्र.१४६/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: २७/०३/२०२५.**

वाचा:-१)वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
२) नियंत्रक,डॉ.बाळासाहेब कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांचे पत्र जा. क्र. डॉबासाकोकृवि/लेखा-२/३१६/२०२५, दि.२१.०१.२०२५.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकांन्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा एकूण अर्थसंकल्पीत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत करण्याच्या सूचना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच,दि.१२.०२.२०२५ च्या शासन निर्णयान्वये कार्यक्रम खर्चाखालील ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या उद्दीष्टाचे प्रस्ताव वित्त विभागाकडे सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

नियंत्रक,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये चालू आर्थिक वर्षात (२४१५ ००८१) या लेखाशिर्षातंर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाकरीता निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यासअनुसरुन डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली यांना मुख्य लेखाशिर्ष "२४१५-कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१,पीकसंवर्धन (२४१५ ००८१) (कार्यक्रम) या लेखाशिर्षातंर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान" या बाबीकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००८१) या लेखाशीर्षातंर्गत ३५, भांडवली मत्ता निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता मूळ अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.६३०.०० लाख (अक्षरी रुपये सहा कोटी, तीस लाख फक्त) इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | सुधारित अंदाज (सन २०२४-२५) | वितरीत निधी | कामाचे नाव/योजना/ योजनेंतर्गत येणारे महाविद्यालयाचे बांधकाम | प्रशासकीय मान्यता आदेश व दिनांक | प्रशासकीय मान्यता किंमत | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०७) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ००८१, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | १४७०.०० | ८४०.०० | मत्स्य अभियांत्रिकी विषयातील पदविका अभ्यासक्रम, शिरगाव, जि.रत्नागिरी | शा.नि.क्र.कोकृवि-२०१०/प्र.क्र.१०१/७-अे, दि.०६/०८/२०१० | ३०६५.०० | ७५.०० |
| २ | | | | सागरी जीवशास्त्रीय संशोधन केंद्र, पेठकिल्ला, रत्नागिरी येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधणे | शा.नि.क्र.कोकृवि-१११५/प्र.क्र.१०६/८अे दि.०३/०७/२०१७ | ८३२.१३ | ३०.०० |
| ३ | | | | डॉ.बा.सा.को.कृ.वि.,दापोली अंतर्गत विविध महाविद्यालये,वसतीगृहे, तसेच इतर विविध शैक्षणिक १८ इमारतींसाठी अग्निशमन यंत्रणा उभारणेबाबत. | शा.नि.क्र.कृषिवि-११२४/प्र.क्र.३४/७अे दि.०९/०२/२०२४ | १४६९.४४ | १००.०० |
| ४ | | | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत दिवेआगर, ता.श्रीवर्धन, जि.रायगड येथे सुपारी संशोधन (विस्तारित) केंद्र स्थापन करणेबाबत.. | शा.नि.क्र.कृषिवि-११२४/प्र.क्र.१४७/७अे दि.२८/०८/२०२४ | १४७१.५७ | ०६.०० |
| ५ | | | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत फॅकल्टी-२ ब्लॉक इमारतींची दुरुस्ती करणेबाबत | शा.नि.क्र.कृषिवि-११२३/प्र.क्र.२००/७अे दि.२३/०२/२०२४ | ४६३.०१ | ६९.०० |
| ६ | | | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत फॅकल्टी-३ ब्लॉक इमारतींची दुरुस्ती करणेबाबत | शा.नि.क्र.कृषिवि-११२३/प्र.क्र.२००/७अे दि.२३/०२/२०२४ | ५०५.४६ | १५०.०० |
| ७ | | | | डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत विविध संशोधन केंद्रे व इमारतींमध्ये अग्निशमन यंत्रणा व सी.सी.टी.व्ही. यंत्रणा उपलब्ध करणेबाबत | शा.नि.क्र.कृषिवि-११२४/प्र.क्र.१५०/७अे दि.०७/११/२०२४ | १४९६.४३ | २००.०० |
| | | **१४७०.००** | **८४०.००** | | | **९३०३.०४** | **६३०.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) प्रत्येक उपलेखाशीर्ष /गट /योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे /हिशोब ठेवावेत.

५) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे, हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखासंहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

७) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

८) विद्यापीठास वितरीत केलेला निधी बँक खात्यामध्ये अखर्चित स्वरुपात पडून राहणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. याप्रीत्यर्थ होणारा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या कार्यक्रम लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ

क्र.४९/का.१४३१, दि.३१/०१/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७३/२०२५/ व्यय-१/ दि.१८/०३/२०२५ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०३२७११४९०४१८०१** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2025.03.27 11:49:57 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली.
६. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
७. सहायक लेखाधिकारी, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,रत्नागिरी/ उपकोषागार अधिकारी,दापोली.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१/ अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१४.उप सचिव, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.उप सचिव, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.